**नारळ पीक विमा योजनेच्या संनियंत्रणाकरीता समितीची स्थापना करणेबाबत**

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र नाविमा २००९/प्र.क्र.१७४/१३अे,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०११

**पहा :-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक- नावियो १३०६/प्र.क्र.८२/१३अे, दिनांक ११/८/२००६

२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक- कृषिआ-१४०८/प्र.क्र.४८२/१६-अे, दिनांक २०/२/२००९

३) संचालक (पीक विमा) भारत सरकार कृषि मंत्रालय कृषि व सहकार विभाग, कृषि भवन, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक १३०११/०३/२००७-क्रेडीट-II, दिनांक २९/९/२००९ व त्यासोबतची सहपत्रे

४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-नाविमा २००९/प्र.क्र.१७४/१३अे, दिनांक २९/९/२०१०

५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक- नाविमा २००९/प्र.क्र.१७४/१३अे, दिनांक १५/१०/२०१०

६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक- नाविमा २००९/प्र.क्र.१७४/१३अे, दिनांक २२/१०/२०१०

**प्रस्तावना -**

नारळाच्या पिकास वातावरणातील बदल, नैसर्गिक आपत्ती, किटक, आग व तत्सम बाबी तसेच रोगांपासून धोका असतो. नारळ हे कोरडवाहू पिक असून ते जैविक व अजैविक रोगांना बळी पडते. सद्यस्थितीत नारळ पिकासह कोणत्याही फळपिकाकरीता फळ विमा योजना राबविण्यात येत नाही. सबब लघु सिमान्त शेतकऱ्यांना नारळ पिकाकरीता फळपिक विमा योजनेद्धारे संरक्षण देणे गरजेचे आहे. सबब, नारळ विमा योजना राज्यात सन २०१०-११ मध्ये प्रायोगिक तत्वावर ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग या जिल्ह्यात राबविण्यास अनुक्रमांक-४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेचे संनियंत्रण करण्यासाठी राज्यस्तरीय संनियंत्रण समितीची स्थापना करण्यात यावी, अशी तरतूद अनुक्रमांक-३ येथील ज्ञापनातील खंड-१८ मध्ये करण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेचे संनियंत्रण करण्यासाठी राज्यस्तरीय संनियंत्रण समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यातील ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग या जिल्ह्यात सन २०१०-११ पासून नारळ विमा योजना प्रायोगिक तत्वावर राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेचे संनियंत्रण करण्यासाठी नारळ विकास मंडळ, भारतीय कृषि विमा कंपनी आणि कृषि विभाग/ फलोत्पादन विभागाचे प्रतिनिधी यांची समिती स्थापन करण्यात यावी, अशी तरतूद अनुक्रमांक-३ येथील ज्ञापनात करण्यात आली आहे. सदर समिती योजनेची प्रगती व योजनेच्या लोकप्रियतेकरीता मार्ग सुचविण्याकरीता तीन महिन्यातून एकदा

बैठक घेईल. शासनाने यापूर्वी अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये नारळ विकास मंडळाच्या योजनेंच्या संनियंत्रणाकरीता प्रधान सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन केली आहे. समितीची रचना खालीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| (१) | प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| (२) | आय.सी.ए.आर. या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| (३) | अध्यक्ष, नारळ विकास मंडळ, कोची | सदस्य |
| (४) | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाचा प्रतिनिधी | सदस्य |
| (५) | संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| (६) | श्री.वसंत विष्णू लिमये, लोकमान्य अपार्टमेंट, अ-८, टिळक लेन, रत्नागिरी | सदस्य |
| (७) | संचालक, नारळ विकास मंडळ, रिजनल ऑफिस, बंगलोर | निमंत्रक |

नारळ विकास मंडळाचे प्रादेशिक कार्यालय ठाणे येथे सुरु करण्यात आले असल्याने वरील समितीतील अनुक्र.-७ येथील संचालक, नारळ विकास मंडळ, रिजनल ऑफिस, बंगलोर यांच्याऐवजी **उपसंचालक, नारळ विकास मंडळ, रिजनल ऑफिस, ठाणे यांचा समावेश करण्यात येत आहे.** नारळ पीक विमा योजनेच्या संनियंत्रणाकरीता सुधारीत समिती खालीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| (१) | प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| (२) | इंडियन कौन्सिल ऑफ ॲग्रीकल्चर रिसर्च या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| (३) | अध्यक्ष, नारळ विकास मंडळ, कोची | सदस्य |
| (४) | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाचा प्रतिनिधी | सदस्य |
| (५) | संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| (६) | श्री.वसंत विष्णू लिमये, लोकमान्य अपार्टमेंट, अ-८, टिळक लेन, रत्नागिरी | सदस्य |
| (७) | उप संचालक, नारळ विकास मंडळ, रिजनल ऑफिस, ठाणे | निमंत्रक |

या समितीचा कार्यकाळ नारळ पीक विमा योजना चालू असेपर्यंत राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक (२०११०२२४१६५०५५००१) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( जी. के. राऊत )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

नारळ विकास मंडळ, कोची
प्रादेशिक व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, २० वा मजला, स्टॉक एक्सचेंज, मुंबई-२३.
संचालक, पिक विमा भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली.
कृषि आयुक्त, कृषि आयुक्तालय, पुणे.
संचालक (फलोत्पादन), पुणे
विभागीय कृषि सह संचालक, ठाणे
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग
अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, १३ वा मजला, अंबादिप बिल्डींग, कस्तूरबा गांधी मार्ग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली.

.

विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
विमा संचालक म्हाडा इमारत, १ला मजला, बांद्रा (पू.), मुंबई.
मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, पुणे
जिल्हाधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग
मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षाअधिकारी, मुंबई
संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,
वित्त विभाग (व्यय-१ ), अर्थसंकल्प -३, १२,
सह सचिव/सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषी व फलो. विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.लोक आयुक्त / मा. उपलोकआयुक्त , नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२.
निवड नस्ती